**जिल्हा परिषद तसेच मान्यता प्राप्त खाजगी १००% अनुदानित पदावरील प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक व अध्यापक विद्यालयातील शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे अशंदान व शासनाचा हिस्सा व कर्मचाऱ्यांच्या अशंदान यावरील व्याज रक्कम राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेमध्ये वर्ग करण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अंनियो- २०२४/प्र.क्र.७९/टिएनटी - ६**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय,
मुंबई ४०० ०३२,
तारीख: ०६ मार्च, २०२५

<u>वाचा -</u>

१. शासन निर्णय क्र.अंनियो ३४१५/प्र.क्र. २७६/टिएनटी ६, दि. १९/०९/२०१९
२. शासन निर्णय क्र.अंनियो-३४२०/प्र.क्र.५५/टिएनटी ६, दि. ०४/०३/२०२१
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दिनांक ०१/०४/२०२४

<u>प्रस्तावना-</u>

जिल्हा परिषदा मान्यताप्राप्त खाजगी अनुदानित प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक व अध्यापक विद्यालयातील १००% अनुदानित पदावरील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांसाठी लागू असलेली परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजना केंद्र शासनाच्या राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेत समाविष्ट करण्याची कार्यपध्दती शालेय शिक्षण विभागाच्या संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये विशद केली आहे. जिल्हा परिषद तसेच मान्यता प्राप्त खाजगी अनुदानित प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक व अध्यापक विद्यालयातील शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांची परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत जमा झालेली रक्कम राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेखाली वर्ग करण्यासाठी नवीन लेखाशिर्ष उघडण्याकरिता संदर्भ क्र. २ अन्वये मान्यता देण्यात आलेली आहे. सन २०२४-२५ मध्ये लेखाशिर्ष ८३४२०२६६ मधील अर्थसंकल्पीय तरतूदीमधून ३०% निधी वितरीत करण्यात आला आहे. आता वित्त विभागाने दिलेल्या मंजूरीप्रमाणे ८३४२०२५७, ८३४२०२७५ व ८३४२०२६६ या लेखाशिर्षातील अर्थसंकल्पीय तरतूदीमधून वित्त विभागाने दिलेल्या मंजुरीनुसार निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता खालील विवरणपत्रानुसार तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतूदीमधून खालीलप्रमाणे निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (BEAMS) द्वारे आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**(रुपये हजारात)**

| योजनेचे नाव व लेखाशीर्ष<br>मागणी क्रमांक | सन २०२४-२५ मध्ये अर्थसंकल्पित निधी | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|
| जी-९९, ८३४२- इतर ठेवी, ००- इतर ठेवी, ११७- शासकीय कर्मचाऱ्यांकरिता परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना,००- परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना, (००) (११), मान्यताप्राप्त व अनुदानित प्राथमिक शाळेतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांची जमा झालेली रक्कम राष्ट्रीय निवृत्ती वेतन योजनेखाली वर्ग करणे (अनिवार्य), (८३४२०२५७) | २६९८५०० | ८०९५५०<br><br>(३० टक्के) |
| जी-९९, ८३४२- इतर ठेवी, ००- इतर ठेवी, ११७- शासकीय कर्मचाऱ्यांकरिता परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना, ००- परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना, (००)(१३), जिल्हा परिषदेकडील शाळेतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांची जमा झालेली रक्कम राष्ट्रीय निवृत्ती वेतन योजनेखाली वर्ग करणे (अनिवार्य), (८३४२०२७५) | १७१६८९५५ | ५१५०६८६<br><br>(३० टक्के) |
| जी-९९, ८३४२- इतर ठेवी, ००- इतर ठेवी, ११७- शासकीय कर्मचाऱ्यांकरिता परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना, ००- परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना, (००)(१२), मान्यताप्राप्त व अनुदानित माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळेतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांची जमा झालेली रक्कम राष्ट्रीय निवृत्ती वेतन योजनेखाली वर्ग करणे (अनिवार्य), (८३४२०२६६) | ४०००००० | ३००००००<br><br>(७५ टक्के) |
| **एकूण** | २३८६७४५५ | ८९६०२३६ |

२. सदर खर्च वरील विवरणातील संबंधित लेखाशीर्षातून सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या संबंधित लेखाशिर्षाच्या उपलब्ध तरतूदीतून भागवावा. तसेच मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

३. सदर निधी वितरीत करण्याबाबतची कार्यवाही शासन निर्णय क्र. ३४१५/प्र.क्र.२७६/टिएनटी ६, दि.१९/०९/२०१९ मधील अटी व शर्तींच्या अधीन राहून वितरीत करण्यात यावा तसेच, वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेले निर्णय, आदेश, सुचनांचे पालन करण्यात यावे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व अनौपचारिक संदर्भ क्र.२९४/व्यय ५, दि.२७/०२/२०२५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३०६१६१६२३१९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORT DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2025.03.06 16:17:36 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव
२. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा / विधानपरिषद, मुंबई
५. मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. मा. विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य, महाराष्ट्र राज्य,
८. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
९. मा. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव
१०. मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहायक
११. मा. राज्यमंत्री (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहायक
१२. अप्पर मुख्य सचिव (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांचे स्वीय सहायक
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र - १ / २, मुंबई / नागपूर

१४. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र - १ / २, मुंबई / नागपूर
१५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१७. स्थानिक निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१८. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे
१९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२०. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२१. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नीरोड, मुंबई
२२. सहसचिव / उपसचिव (विद्यार्थी विकास / शाळा व्यवस्थापन / शिक्षक शिक्षकेतर / प्रशासन / समन्वय / अर्थसंकल्प / क्रीडा ) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
२३. शिक्षण संचालक (माध्य. व उच्च माध्य. / प्राथमिक / प्रौढ व अल्पसंख्यांक / SCERT / महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद) महाराष्ट्र राज्य, पुणे
२४. अध्यक्ष, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, महाराष्ट्र राज्य, पुणे
२५. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
२६. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद
२७. सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्यमिक / प्रौढ)
२८. सर्व अधिक्षक, वेतन पथक (प्राथमिक / माध्यमिक)
२९. वित्त विभाग (व्यय-५ / व्यय-१४ / अर्थसंकल्प - २) मंत्रालय, मुंबई
३०. सर्व कार्यासने, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
३१. निवड नस्ती, कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.